महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास (जमिनीचे वाटप) विनियम, १९८२ मधील विनियम १६ खालील शासनाच्या स्तरावर म्हाडाच्या निवासी/अनिवासी भूखंडाच्या वितरणाकरीता मंत्रिमंडळ उपसमिती गठीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग**
**शासन निर्णय क्र. सुविधा-२०११/प्र.क्र.२४२/पुनर्बांधणी-३/गृनिभू**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ०१ एप्रिल, २०१७

वाचा :- शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग, क्र.सुविधा-११९९/प्र.क्र.३०४०/गृनिभू-१, दि.८/३/२०१०

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास (जमिनीचे वाटप) विनियम, १९८२ अंतर्गत विनियम १६ चा वापर करुन शासनातर्फे म्हाडाच्या निवासी/अनिवासी भूखंडाचे वितरण करण्यासाठी संदर्भाधीन शासन निर्णयान्वये मंत्रिमंडळ उप समिती गठीत करण्यात आलेली होती. दरम्यानच्या काळात नव्याने मंत्रिमंडळ अस्तित्वात आले असल्यामुळे सदरहू समितीचे नव्याने गठन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास (जमिनीचे वाटप) विनियम, १९८२ अंतर्गत विनियम १६ अन्वये शासनास प्राप्त झालेल्या अधिकारांचा वापर करण्यासाठी मंत्रिमंडळ उपसमिती गठीत करण्यासंदर्भात या आधी निर्गमित केलेले सर्व आदेश अधिक्रमित करुन आता पुढीलप्रमाणे मंत्रिमंडळ उपसमिती गठीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे :-

| | | |
|---|---|---|
| १) | मा.मंत्री, गृहनिर्माण | **- अध्यक्ष** |
| २) | मा.मंत्री, शालेय शिक्षण, क्रीडा आणि युवक कल्याण, उच्च व तंत्रशिक्षण, मराठी भाषा, सांस्कृतिक कार्य, अल्पसंख्यांक विकास व वक्फ. | **- सदस्य** |
| ३) | मा.राज्यमंत्री, गृहनिर्माण, उच्च व तंत्र शिक्षण | **- सदस्य** |
| ४) | मा.राज्यमंत्री, नगर विकास, गृह (शहरे), विधी व न्याय, संसदीय कार्य, कौशल्य विकास आणि उद्योजकता, माजी सैनिकांचे कल्याण | **- सदस्य** |
| ५) | मा.अपर मुख्य सचिव, गृहनिर्माण विभाग | **- निमंत्रक** |
| ६) | मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव | **- कायम निमंत्रक** |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०१७०४०११७४६५२२१०९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

M.U.Bharose

Digitally signed by M.U.Bharose
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Housing Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f3abf3ab8b16dfec487f18ce64d6b0ab8e38d8925d44d15f7dbd61babb4ae6df, cn=M.U.Bharose
Date: 2017.04.01 17:49:52 +05'30'

**(मुं.उ.भरोसे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मंत्री, गृहनिर्माण, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

२) मा.मंत्री, शालेय शिक्षण, क्रीडा आणि युवक कल्याण, उच्च व तंत्रशिक्षण, मराठी भाषा, सांस्कृतिक कार्य, अल्पसंख्यांक विकास व वक्फ, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
३) मा.राज्यमंत्री, गृहनिर्माण, उच्च व तंत्र शिक्षण, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
४) मा.राज्यमंत्री, नगर विकास, गृह (शहरे), विधी व न्याय, संसदीय कार्य, कौशल्य विकास आणि उद्योजकता, माजी सैनिकांचे कल्याण, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
५) मा.अपर मुख्य सचिव, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
६) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
७) उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०० ०५१
८) सर्व मुख्य अधिकारी, मुंबई/कोकण/पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ
९) गृहनिर्माण विभागातील सह/उप सचिव व सर्व अवर सचिव व सर्व कक्ष अधिकारी
१०) निवडनस्ती (गृनिभू), गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

************